**पेसा ग्राम पंचायतींना अबंध निधी योजना ग्रामस्तरीय लोकप्रतिनिधी, ग्रामसभाकोष समिती सदस्य व कर्मचारी यांच्या प्रभाग स्तरीय प्रशिक्षणाबाबत सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पेसाअ-२०१५/प्र.क्र.८०/का.१७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २१ ऑगस्ट २०१५.

**वाचा :** १) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.पेसा २०१५/प्र.क्र.१९/का-१७ , दि.२१ एप्रिल २०१५.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.पेसा २०१५/प्र.क्र.८०/का-१७ , दि.१ ऑगस्ट, २०१५.

**प्रस्तावना:-**

पंचायत विस्तार (अनुसूचित क्षेत्र) अधिनियम (पेसा), वन हक्क कायदा तसेच महाराष्ट्र ग्राम पंचायत अधिनियम (१९५८) यातील प्रकरण ३-अ या अन्वये अनुसूचित क्षेत्रातील आदिवासी ग्रामसभांना विशेष अधिकार देण्यात आले आहेत. आदिवासींच्या विकासासाठी स्वतंत्र आदिवासी उपयोजना कार्यरत आहे. आदिवासी जमातींचे सांस्कृतिक वैविध्य आणि विकासाच्या वैशिष्ट्यपूर्ण गरजा लक्षात घेता तसेच आदिवासी समाज खऱ्या अर्थाने सक्षम व स्वावलंबी व्हावा यासाठी ग्रामसभेनेच विकासाचे उपक्रम ठरविणे व राबविणे आवश्यक आहे. हे लक्षात घेऊन या विभागाने आदिवासी उपयोजनेतील काही निधी अनुसूचित क्षेत्रातील ग्रामसभांना अबंध स्वरुपात देण्याचा निर्णय घेतला आहे. सन २०१५-१६ या वर्षापासून सदर योजना आपल्या राज्यात लागू झाली आहे. या अभिनव योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी पेसा क्षेत्रातील ग्राम पंचायती, ग्रामसभा कोष समित्या, गावस्तरीय कर्मचारी इत्यादींचे प्रशिक्षण व क्षमताबांधणी होणे आवश्यक आहे. दुर्गम भागातील प्रशिक्षणार्थी, विशेषत: महिला, यांना प्रशिक्षणाचा लाभ घेणे सुलभ व्हावे या करिता ग्राम विकास विभागाने यापूर्वी राबविलेल्या क्रांतीज्योती प्रशिक्षणाच्या धर्तीवर पेसा ग्राम पंचायतींचे प्रशिक्षण देखील प्रत्येक जिल्हा परिषद प्रभागामध्ये स्थानिक पातळीवरच आयोजित करण्याबाबत सूचना लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित क्षेत्रातील ग्राम पंचायतींना मुक्त निधी योजनेबाबत ग्रामस्तरीय लोकप्रतिनिधी, समिती सदस्य व कर्मचारी यांना जिल्हा परिषद प्रभागाच्या स्तरावर प्रशिक्षण देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रशिक्षण खालील पद्धतीने आयोजित करावे.

**१) प्रशिक्षणार्थी:-** अनुसूचित क्षेत्रातील प्रत्येक ग्राम पंचायतीतून सरपंच अथवा उपसरपंच, ग्राम पंचायतीच्या एकत्रित ग्रामसभा कोष समितीचे तीन सदस्य (ग्रामसेवक धरून) व ग्राम पंचायतीअंतर्गत वनहक्क कायद्याखाली तयार झालेल्या समित्यांच्या वतीने एकप्रतिनिधी अशा प्रकारे प्रत्येक ग्राम पंचायतीमधून सरासरी ५ व्यक्ती प्रशिक्षणामध्ये सहभागी होतील. या प्रमाणे, २८३५ ग्राम

पंचायतींमधील प्रशिक्षणार्थींची एकूण संख्या १४१७५ म्हणजेच अंदाजे १४५०० इतकी अपेक्षित आहे.

**२) प्रशिक्षणाचा कालावधी:-** ग्रामस्तरीय लोकप्रतिनिधी, समिती सदस्य व कर्मचारी यांचे उपरोक्त प्रशिक्षण हे तीन दिवस कालावधीचे व अनिवासी पद्धतीचे असेल. सदर प्रशिक्षण ऑक्टोंबर २०१५ अखेर पूर्ण करणे अपेक्षित आहे.

**३) प्रशिक्षणाची रचना, वाचन साहित्य व प्रवीण प्रशिक्षक:-** प्रशिक्षणाची रचना, वाचन साहित्य व प्रवीण प्रशिक्षक हे यशदा, पुणे, यांनी निश्चित केल्याप्रमाणे असतील. आदिवासी विकास विभागामार्फत प्रशिक्षण साहित्य मुद्रित करून ते संबंधित जिल्हा परिषदांना आवश्यक प्रमाणात वितरीत करण्यात येईल. तसेच यशदामार्फत प्रवीण प्रशिक्षकांना प्रशिक्षण देऊन त्यांना संबंधित जिल्ह्यांमध्ये पर्याप्त संख्येने नियुक्त करण्यात येईल.

**४) प्रशिक्षणाच्या व्यवस्थापनाची यंत्रणा व प्रशिक्षणाचे स्थळ:-** प्रशिक्षणाच्या जिल्हा स्तरीय व्यवस्थापनाची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रा.पं.) यांचेवर राहील. तसेच गट विकास अधिकारी हे प्रशिक्षण उपक्रमांचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. प्रशिक्षणाचे प्रत्यक्ष आयोजन करण्यासाठी अनुसूचित क्षेत्रातील प्रत्येक प्रभागातील एक मोठी, मध्यवर्ती व प्रशिक्षणासाठी आवश्यक सुविधा (जसे प्रशिक्षण हॉल, भोजन व्यवस्था, स्वच्छतागृह, वीज, पाणी, इंटरनेट, इत्यादी) असलेली ग्राम पंचायत निवडण्यात येईल. प्रत्येक प्रभागातील सरासरी १० ग्राम पंचायतींसाठी तीन दिवसीय अनिवासी प्रशिक्षणाचे आयोजन सदर मध्यवर्ती ग्राम पंचायतीमध्ये करण्यात येईल. निवडलेल्या मध्यवर्ती ग्राम पंचायती प्रशिक्षणाचे आयोजन करण्यास इच्छुक व सक्षम आहेत असे वाटल्यास प्रशिक्षणाचा निधी संबंधित ग्राम पंचायतींना वर्ग करता येईल, अन्यत: संबंधित गट विकास अधिकारी यांचे स्तरावरून प्रशिक्षण आयोजित करण्यात येईल. स्थानिक परिस्थितीनुसार सदर निर्णय घेण्यास उपमुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रा.पं.) हे सक्षम असतील.

**५) प्रशिक्षणासाठी निधीची तरतूद व वितरण:** क्रांतीज्योती प्रशिक्षणाच्या धर्तीवर उपरोक्त प्रशिक्षणासाठी प्रति दिन प्रति व्यक्ती रु.४४०/- इतकी तरतूद उपलब्ध राहील. संबंधित जिल्ह्यांतील अनुसूचित क्षेत्रातील ग्राम पंचायतींच्या संख्येनुसार प्रशिक्षणाचा निधी जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) यांच्या संयुक्त खात्यावर वितरीत करण्यात येईल. जिल्हा परिषदेमार्फत निधी संबंधित पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी यांना वितरीत करण्यात येईल. प्रशिक्षण कार्यक्रम कालबद्ध पद्धतीने पूर्ण करण्यासाठी जिल्हा स्तरावर निधीचे वितरण झाल्यावर कोणत्याही परिस्थितीत पुढील टप्प्यावर एक आठवडा कालावधीत निधीचे वितरण होणे आवश्यक राहील. निधीची तरतूद व खर्चाचे दर याचे तपशील **परिशिष्ट-१** नुसार राहतील.

**६) प्रशिक्षणाच्या आयोजनाची सविस्तर पद्धती:-**

सदर प्रशिक्षण विकेंद्रित स्वरुपात आयोजित करावयाचे असल्याने राज्यस्तरापासून ग्राम स्तरापर्यंत प्रशिक्षणाच्या व्यवस्थापनामध्ये सुसूत्रता राहावी याकरिता कार्यवाहीचे मुद्दे व जबाबदाऱ्यांचे वाटप खालील प्रमाणे असेल.

**अ) जिल्हास्तरावरील कार्यवाही**

१. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे गट विकास अधिकारी तसेच संबंधित जिल्ह्याकरिता नेमलेले प्रवीण प्रशिक्षक यांची समन्वय बैठक घेऊन प्रस्तुत मार्गदर्शक सूचनांनुसार प्रशिक्षणाची

कार्यपद्धती समजावून सांगतील व जिल्ह्यातील प्रशिक्षणाचे संपूर्ण नियोजन करतील. सदर प्रशिक्षण ऑक्टोंबर २०१५ अखेर पूर्ण होईल अशापध्दतीने नियोजन करतील.

२. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांचे कडून प्रशिक्षणाचा निधी गट विकास अधिकारी यांना तालुकानिहाय अनुसूचित क्षेत्रातील ग्राम पंचायतींच्या संख्येनुसार वर्ग करण्यात येईल.

३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांचे मार्फत प्रशिक्षण साहित्य गट विकास अधिकारी यांना तालुकानिहाय पेसा ग्राम पंचायतींच्या संख्येनुसार वितरीत करण्यात येईल.

४. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे गट विकास अधिकारी यांचेकडून प्रशिक्षणाच्या आयोजनासाठी प्रत्येक प्रभागातील एक मोठी व मध्यवर्ती ग्राम पंचायत निश्चित करून घेतील. तसेच, प्रशिक्षणाचे आयोजन गट विकास अधिकारी यांचे मार्फत थेटपणे करावयाचे अथवा त्याची जबाबदारी संबंधित मध्यवर्ती ग्राम पंचायतीस द्यायची हे देखील निश्चित करण्यात येईल.

५. राजीव **गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान अंतर्गत जिल्ह्यामध्ये पेसा जिल्हा समन्वयक यांची नेमणूक झाली असल्यास उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांचे मार्गदर्शनाखाली ते उपरोक्त प्रशिक्षणाचे जिल्हा स्तरीय नोडल अधिकारी म्हणून काम बघतील. जेथे जिल्हा पेसा समन्वयक पद रिक्त असेल तेथे तालुका पेसा समन्वयक यांनी नोडल अधिकारी पदाची जबाबदारी पार पाडावी.**

६. प्रशिक्षणामध्ये सहभाग वाढविण्यासाठी जिल्हा माहिती अधिकारी यांचेद्वारे स्थानिक प्रसार माध्यमांमार्फत सदर प्रशिक्षणास प्रसिद्धी देण्यात येईल.

७. प्रशिक्षणाची योग्य प्रकारे अंमलबजावणी होण्यासाठी तसेच प्रशिक्षणार्थींची उपस्थिती प्रोत्साहित करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.), उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे तालुका निहाय आढावा बैठका घेतील तसेच इतर जिल्हा स्तरीय अधिकाऱ्यांसह काही प्रशिक्षण कार्यक्रमांना भेटी देतील.

८. प्रशिक्षण **पूर्ण झाल्यावर उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे संबंधित गट विकास अधिकारी (पं.स.) यांचेकडून तालुकानिहाय प्रशिक्षणाचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र घेतील. जिल्ह्याचा एकत्रित अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.) यांचे स्वाक्षरीने ग्राम विकास विभाग व आदिवासी विकास विभागास सादर करण्यात येईल.**

**ब) तालुका स्तरावरील कार्यवाही**

१. जिल्हा स्तरावरील समन्वय बैठक झाल्यानंतर आवश्यकतेनुसार गट विकास अधिकारी हे विस्तार अधिकारी (ग्रा.पं.), निवडलेल्या मध्यवर्ती ग्राम पंचायतींचे सरपंच व ग्राम सेवक तसेच संबंधित प्रवीण प्रशिक्षक यांची बैठक घेऊन प्रशिक्षणाच्या आयोजनातील सर्व तपशील (जसे प्रत्येक प्रभागातून मध्यवर्ती ग्राम पंचायतींची निवड, निधीची मागणी व वितरण, साहित्याची मागणी व वितरण, इत्यादी) याचे संपूर्ण नियोजन करून घेतील.

२. राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान अंतर्गत तालुक्यामध्ये पेसा तालुका समन्वयक यांची नेमणूक झाली असल्यास ते विस्तार अधिकारी (ग्रा.पं.) यांचे मार्गदर्शनाखाली उपरोक्त प्रशिक्षणाचे तालुका स्तरीय नोडल अधिकारी म्हणून काम बघतील.

३. गट विकास अधिकारी यांनी तालुक्यातील पेसा क्षेत्रानुसार जिल्हा परिषद प्रभाग हा घटक धरुन संबंधित प्रत्येक प्रभागातील एका मोठया व मध्यवर्ती ग्रामपंचायतीची निवड खालील प्रमाणे करावी:

- नोडल अधिका-यांनी संबंधित प्रभागास प्रत्यक्ष भेट देऊन पाहणी करावी.
- निवड करावयाच्या ग्राम पंचायतीमध्ये प्रशिक्षणासाठी सभागृह, शक्यतो महिला बचत गटामार्फत भोजन व्यवस्थेची उपलब्धता, पिण्याचे पाणी व स्वच्छतागृहाची उपलब्धता, प्रभागातील गावांतून प्रशिक्षणार्थींना येण्या-जाण्यासाठी वाहनाची उपलब्धता, आदि बाबींची काळजीपूर्वक पाहणी करावी.
- तसेच, सरपंच व ग्रामसेवक यांचेशी चर्चा करून प्रशिक्षणाचे आयोजन करण्याबाबत संबंधित ग्राम पंचायत इच्छुक आहे काय याची पडताळणी करावी.

४. प्रशिक्षणाच्या आयोजनासाठी प्रभागनिहाय निवडलेल्या ग्राम पंचायतींची यादी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांना माहितीसाठी पाठविण्यात येईल.

५. गट विकास अधिकारी हे तालुक्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्राम पंचायती तसेच त्यातील प्रशिक्षणार्थींच्या संख्येनुसार निधीची मागणी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांना सादर करतील. प्रशिक्षणाच्या आयोजनाची जबाबदारी मध्यवर्ती ग्राम पंचायतीस दिली असल्यास प्रशिक्षणाचा निधी आवश्यक प्रमाणात प्रभागातील मध्यवर्ती ग्राम पंचायतींना वितरित करण्यात येईल.

६. गट विकास अधिकारी यांनी तालुक्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्राम पंचायतींच्या संख्येनुसार साहित्याच्या संचांची मागणी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांना करतील. जिल्हा स्तरावरून प्रशिक्षण साहित्य प्राप्त झाल्यावर प्रत्येक प्रभागातील मध्यवर्ती ग्राम पंचायातीस प्रभागातील पेसा ग्रामपंचायतींच्या संख्येइतके साहित्याचे संच वितरित करण्यात येतील.

७. गट विकास अधिकारी हे प्रत्येक प्रभागातील कार्यक्रमासाठी पेसा तालुका समन्वयक अथवा विस्तार अधिकारी (ग्रा.पं.) अथवा समकक्ष अधिकारी यांना सत्र समन्वयक म्हणून नियुक्त करतील तसेच प्रत्येक कार्यक्रमासाठी यशदाने नियुक्त केलेले प्रशिक्षक नेमून देतील.

८. गट विकास अधिकारी हे निधी व साहित्याचे वितरण सुनिश्चित करून त्यानुसार प्रशिक्षणाचे प्रभाग निहाय वेळापत्रक तयार करतील. कोणत्याही परिस्थितीत प्रशिक्षणाच्या तारखेपूर्वी निधी व साहित्य वितरित होईल याची दक्षता गट विकास अधिकारी यांनी घ्यावी.

९. गट विकास अधिकारी हे त्यांच्या स्वाक्षरीने पत्र देवुन प्रभागातील प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षणास निमंत्रित करतील.

१०. गट विकास अधिकारी हे इतर तालुका स्तरीय अधिकारी यांचे समवेत काही प्रशिक्षण कार्यक्रमांना भेटी देऊन आयोजन व उपस्थितीची पाहणी करतील.

११. प्रशिक्षण कार्यक्रम पुर्ण झाल्यावर गट विकास अधिकारी हे त्याचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांना सदर करतील. तसेच सदरचा अहवाल, प्रशिक्षणाचे फोटोग्राफ व उपयोगिता प्रमाणपत्र आदिवासी विकास विभागाकडून विकसित करण्यात येत असलेल्या संगणक प्रणालीवर अपलोड करतील.

**क) आयोजनकर्त्या ग्रामपंचायतीच्या स्तरावरील कार्यवाही**

१. प्रभागातील मध्यवर्ती ग्राम पंचायतीस प्रशिक्षणाच्या आयोजनाची जबाबदारी दिल्यास मध्यवर्ती ग्राम पंचायतींच्या स्तरावरील कार्यवाही खालील प्रमाणे असेल.

२. ग्राम सेवक हे संबंधित प्रभागातील प्रशिक्षण उद्दिष्टानुसार आवश्यक निधी व प्रशिक्षण साहित्य गट विकास अधिकारी यांचे कडून प्राप्त करून घेतील.

३. ग्राम सेवक हे ग्राम पंचायतीतील प्रशिक्षण स्थळ, तेथील आवश्यक साधन-सुविधा व प्रशिक्षण व्यवस्थायांची पाहणी करून खालील बाबींची पूर्तता करतील:
   - ६० प्रशिक्षणार्थी गोलाकार बसू शकतील व अभ्यास खेळ, गटचर्चा व अध्ययन सत्र घेता येतील असे सभागृह असलेले प्रशिक्षण स्थळ असावे.
   - सभागृहात पुरेसा प्रकाश व खेळती हवा असावी.
   - सभागृहात विजेची व्यवस्था असावी.
   - भोजनाचे ठिकाण सभागृहापासून फार दूर नसावे.
   - सभागृहाजवळ स्वच्छतागृहाची सुविधा असावी.
   - लिहिण्याकरिता फळा, खडू, डस्टर इ. असावे.

४. ग्राम सेवक हे तीन दिवसीय प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण झाल्यावर तिसऱ्या दिवशी प्रशिक्षकांना विहित केलेल्या दरानुसार मानधन व प्रवास खर्च अदा करून त्यांची पावतीवर सही घेतील.

५. तसेच, ग्राम सेवक हे प्रशिक्षणास उपस्थित प्रशिक्षणार्थीना उपस्थिती नुसार प्रवासखर्च अदा करतील. कार्यक्रम पूर्ण झाल्यावर ग्राम सेवक एक आठवड्याच्या आत प्रशिक्षणाचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र गट विकास अधिकारी यांना सदर करतील.

**७) खर्चाचे दर:-**

प्रत्येक कार्यक्रमासाठी सरासरी ५० प्रशिक्षणार्थींची उपस्थिती अपेक्षित असली तरी प्रशिक्षक, आयोजनात सहभागी कर्मचारी इत्यादी विचारात घेता ६० व्यक्तींच्या भोजनाची व्यवस्था करण्यास मुभा राहील. प्रति प्रशिक्षण कार्यक्रम निधीची तरतुद व खर्चाचे तपशील **परिशिष्ट-१** प्रमाणे असतील.

**८) प्रशिक्षणाचा अहवाल व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र**

१. गट विकास अधिकारी हे अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रांचे संकलन करून उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) यांना सदर करतील.

२. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.) यांच्या मान्यतेने व स्वाक्षरीने अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र ग्राम विकास विभाग व आदिवासी विकास विभागास सादर करतील.

**परिशिष्ट-१: प्रशिक्षणासाठी निधीची तरतूद व खर्चाचे दर**

| | |
|---|---|
| ग्रामस्तरीय प्रशिक्षणासाठी निधीचा दर: | रु. ४४० प्रती व्यक्ती प्रती दिन |
| प्रती प्रशिक्षण कार्यक्रम प्रशिक्षणार्थींची सरासरी संख्या | ५० (१० ग्राम पंचायती x ५) |
| प्रती प्रशिक्षण कार्यक्रम निधीची एकूण तरतूद | **रु. ६६,०००/-** (५०व्यक्ती x ४४० x ३ दिवस) |

**खर्चाचे दर**

| अ.क्र. | स्थानिक स्तरीय तीन दिवसीयप्रशिक्षण | संख्या | कालावधी (दिवस) | खर्चाचा दर | रक्कम (रु). |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षण वर्ग, पाणी, शौचालय, इत्यादी व्यवस्था | -- | -- | ३००० | ३००० |
| २ | जनरेटरची व्यवस्था (आवश्यकता भासल्यास) | -- | -- | ३००० | ३००० |
| ३ | भोजन- नाश्ता- चहा | ६० | ३ | १६० | २८८०० |
| ४ | लेखन साहित्य, पेन, फोल्डर | ६० | -- | ५० | ३००० |
| ५ | प्रशिक्षक मानधन | ३ | ३ | १००० | ९००० |
| ६ | प्रशिक्षकांचा प्रवास खर्च | ३ | -- | ५०० | १५०० |
| ७ | प्रशिक्षणार्थी प्रवास खर्च | ५० | ३ | १०० | १५००० |
| ८ | प्रात्यक्षिके व गटकार्य यासाठी चार्ट पेपर, स्केचपेन, बॉक्सफाईल, इत्यादी साहित्य | -- | -- | १००० | १००० |
| ९ | प्रशिक्षण अहवालासाठी फोटो अपलोडिंग व डेटा एन्ट्रीचे मानधन | -- | -- | १००० | १००० |
| १० | सादील/ आकस्मिक खर्च | -- | -- | ७०० | ७०० |
| | **एकूण** | | | | **६६,०००** |

सदर शासन निर्णय ग्रामविकास विभागाने त्या विभागाची नस्ती क्र. पेसाअ-२०१५/प्र.क्र.३५ (भाग-२) /पंरा-२ यावर प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२११६२५३९९३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2015.08.21 16:29:03 +05'30'

**(प्रभाकर बा. गावडे)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
५. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
७. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन

८. मा. प्रधान सचिव (ग्रामविकास विभाग), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई ४०० ००१
९. मा. सचिव (वने), मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई
१२. आयुक्त,आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
१३. जिल्हाधिकारी, ठाणे, पालघर, नाशिक, नंदुरबार, धुळे, अहमदनगर, जळगाव, अमरावती, यवतमाळ, चंद्रपुर, गडचिरोली, पुणे, नांदेड.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे, पालघर, नाशिक, नंदुरबार, धुळे, अहमदनगर, जळगाव, अमरावती, यवतमाळ, चंद्रपुर, गडचिरोली, पुणे, नांदेड.
१५. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर.
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१७. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं), ठाणे, पालघर, नाशिक, नंदुरबार, धुळे,अहमदनगर, जळगाव, अमरावती, यवतमाळ, चंद्रपुर, गडचिरोली, पुणे, नांदेड.
१८. गटविकास अधिकारी, पंचायत समिती, ठाणे, पालघर, नाशिक, नंदुरबार, धुळे, अहमदनगर, जळगाव, अमरावती, यवतमाळ, चंद्रपुर, गडचिरोली, पुणे, नांदेड. (जिल्हयातील सर्व पेसा तालुके)
१९. निवडनस्ती (का. १७)